**ग्रँट डफचे जुजबी चरित्र**

जेम्स कनिंगहॅम ग्रँट डफ

अ.रा. कुलकर्णी

पुणे विद्यापीठ, पुणे १९७१

रु. १४.००

ग्रँट डफचा मराठ्यांचा इतिहास मी वाचलेला नाही. त्याचे नाव तेवढे त्या संदर्भात कानावरून गेलेले. (अलिकडच्या एक दोन पिढ्यांच्या बाबतीत, अपवाद वगळता, त्याचे नावही कानांवरून गेलेले नसण्याची शक्यता आहे.) पक्षपाती बुद्धीने, मराठ्यांवर अन्याय करणारा इतिहास लिहिणारा ग्रँट डफ असा त्यावेळपासून मनावर ठसा. मराठ्यांचा इतिहास लिहिण्यासाठी त्याने किती परिश्रम घेतले, मूळ साधने पहाण्यावर त्याचा कसा कटाक्ष होता, आणि मुख्य म्हणजे, त्याला मराठी राज्याबद्दल प्रेम कसे होते, या गोष्टी डॉ. कुलकर्णी यांच्या प्रस्तुत चरित्रावरून ध्यानी येतात व ग्रँट डफविषयी मनात कृतज्ञ भाव निर्माण होतो. ज्या काळात त्याने इतिहासलेखन केले व ज्या दडपणाखाली केले - ग्रँट डफ साताऱ्याचा रेसिडेंट म्हणून अत्यंत जबाबदारीचे काम पार पाडीत होता - ते लक्षात घेता विवेचक, विश्लेषक इतिहासापेक्षा संकलनात्मक इतिहास लिहिण्यापलीकडे तो फारसा गेला नाही यात आश्चर्य नाही. खरे आश्चर्य असे की, स्वतःच्या गतेतिहासासंबंधी तीव्र अभिमान बाळगणाऱ्या आम्ही ‘मराठ्यां’नी आजपर्यंत असा इतिहासकार जन्माला घातलेला नाही! अव्वल दर्जाच्या विश्लेषक बुद्धिमत्तेची माणसे इतिहासलेखनाकडे अलीकडच्या काळात वळलीच नाहीत.

डॉ. कुलकर्णींनी प्रथमतः ग्रँट डफचे थोडक्यात संपूर्ण चरित्र सांगून, नंतर त्याची साताऱ्यातील कारकीर्द वर्णिली आहे. पुस्तकाच्या उत्तरार्धात ग्रँट डफच्या इतिहासलेखनाची कथा विस्ताराने सांगितली असून, शेवटच्या प्रकरणात ग्रँट डफच्या इतिहासावरील प्रमुख मराठी टीकाकारांच्या टीकेचा परामर्श घेतला आहे.

दुर्दैव असे की, डॉ. कुलकर्णींच्या लेखनात शैलीचा कमालीचा अभाव आहे. त्यातच, त्यांची विषयाची हाताळणी अत्यंत सदोष व उथळ आहे. उदाहरणादाखल, रेसिडेंट म्हणून ग्रँट डफने जे काम केले ते ज्या व्यापक पार्श्वभूमीवर आणि विशिष्ट स्थानिक संदर्भात केले ते दोन्ही पैलू समाधानकारकपणे नजरेसमोर येत नाही. हीच गोष्ट त्याच्या इतिहासाबद्दलची. त्याचे मुख्य प्रतिपादन काय, याचा पत्ताच लागत नाही.

डॉ. कुलकर्णी यांनी ग्रँट डफच्या पत्रव्यवहाराचा पुष्कळ उपयोग केला आहे. पुस्तक वाचून झाल्यावर असे मनात येते की त्यांनी ग्रँट डफचा पत्रव्यवहार सरळ संपादित केला असता तर त्यांनी ग्रँट डफची, व पर्यायाने मराठी वाचकांची, अधिक भरीव सेवा केली असती.